अंशतः बदल
उप अभियंता (स्थापत्य)
सार्वजनिक बांधकाम विभाग.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस २०१८/ प्र.क्र.२१३/सेवा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २.११.२०१८

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या नियम ४ (४) (एक) मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने विनंतीनुसार/ प्रशासकीय कारणास्तव खालील नमूद अभियंत्यांच्या नावासमोरील रकाना क्र.३ मध्ये नमूद केलेल्या पदोन्नती/बदली आदेशात अंशतः बदल करण्यात येऊन त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोरील रकाना क्र.४ मध्ये दर्शविलेल्या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उप अभियंता यांचे नांव | बदली आदेशाचा क्रमांक, दिनांक व पदस्थापनेचे ठिकाण | रकाना क्र.३ मधील बदली आदेशात अंशतः बदल करून देण्यात आलेले पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.ए.एम.ठाकरे | शासन आदेश क्र.पीओजी २०१८/ प्र.क्र.१३८/ सेवा-२, दिनांक १४.८.२०१८ च्या पदोन्नती आदेशान्वये जागतिक बँक प्रकल्प उप विभाग, अहमदनगर | उप कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, नाशिक |
| २. | श्री.डी.एस.मांगे | शासन आदेश क्र.एलटीएस २०१८/ प्र.क्र.१५५/सेवा-२, दिनांक ९.११.२०१८ च्या बदली आदेशान्वये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, अमरावती | सा.बां.उप विभाग, अंजनगांव सुर्जी |
| ३. | श्री.अजयकुमार काशिनाथ महाजन | शासन आदेश क्र.पीओजी २०१८/ प्र.क्र.१३४/ सेवा-२, दिनांक ४.८.२०१८ च्या पदोन्नती आदेशान्वये सा.बां.उप विभाग क्र.२, कोपरगांव | मार्ग प्रकल्प उप विभाग क्र.४, जळगांव |

| अ.क्र. | उप अभियंता यांचे नांव | बदली आदेशाचा क्रमांक, दिनांक व पदस्थापनेचे ठिकाण | रकाना क्र.३ मधील बदली आदेशात अंशतः बदल करून देण्यात आलेले पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| ४. | श्री.आर.पी.नरवाडे | शासन आदेश क्र.पीओजी २०१८/ प्र.क्र.१८३/सेवा-२,दि.३१.१०.२०१८ च्या पदोन्नती आदेशान्वये सा.बां.उप विभाग, जाफ्राबाद | सा.बां.उप विभाग, देगलूर |
| ५. | श्री.एस.एल.शुक्ला | शासन आदेश क्र.पीओजी २०१८/ प्र.क्र.१८३/सेवा-२,दि.३१.१०.२०१८ च्या पदोन्नती आदेशान्वये सा.बां.उप विभाग, पुलगांव | जागतिक बँक प्रकल्प उप विभाग क्र.१, नागपूर |

२. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी उपरोक्त उप अभियंता यांना नवीन नेमणूकीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

३. उपरोक्त उप अभियंता यांनी नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल. तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही, याची जाणीव सबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच त्यांचे लक्ष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ कडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील, याचीही नोंद घ्यावी.

४. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी उपरोक्त अभियंत्यांनी पदभार सोडल्याचा व स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहीत कालावधीत संबंधित अधिकारी बदलीच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणे करुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज स्वीकारु नयेत/ मंजूर करु नयेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०२१७४१०८१४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Jagannath Kamble

Digitally signed by Arvind Jagannath Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, serialNumber=9002cefc24afd7333b681924b5ec78d113291ff4a25db398420a06cd457d41f5, cn=Arvind Jagannath Kamble
Date: 2018.11.02 17:47:47 +05'30'

**(अ.ज. कांबळे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल १/२ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई/नागपूर
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक/अमरावती/औरंगाबाद/नागपूर
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती
४. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर/नाशिक/अमरावती/जळगांव/नांदेड/नागपूर
५. संबंधित उप अभियंता यांना संबंधित मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि.यांच्या मार्फत.
६. मा. मंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) /मा.मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम) /मा.राज्यमंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून)/मा. राज्यमंत्री, सा.बां., (सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (सा.बां.)/सचिव (रस्ते/बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
८. निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.